Dura Oxygen Cylinders चा पुरवठा न केल्याबाबत मे. आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी यांना ०१ वर्षाच्या कालावधीसाठी काळया यादीत टाकण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१०२१/प्र.क्र.२२७/आरोग्य-८
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २३ डिसेंबर , २०२१.

वाचा :-

१) सहसंचालक आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई यांचे पत्र क्र.आआसे/खरेदी कक्ष/३५Dura Oxygen Cylinder/२२५९/२०२१ दि.१५.०८.२०२१
२) सहसंचालक आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई यांचे पत्र क्र.आआसे/खरेदी कक्ष/३५Dura Oxygen Cylinder/३६२४/२०२१ दि.०६.१२.२०२१
३) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडील दिनांक ०४.०८.२०२१ रोजीची मान्य टिप्पणी.

प्रस्तावना:-

सहसंचालक आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई कार्यालय यांनी त्यांच्या दिनांक १५.०८.२०२१ व दि.०६.१२.२०२१ च्या प्रस्तावात नमूद केल्यानूसार Dura Oxygen Cylinders चा पुरवठा न केल्याबाबत मे. आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी यांना ०१ वर्षाच्या कालावधीसाठी काळया यादीत टाकण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय :-

कोविड- १९ च्या उपचारासाठी रुग्णांना ऑक्सिजनची कमतरता भासू नये यासाठी ऑक्सिजनचा साठा करण्यासाठी शासनाच्या मान्यतेने Dura Oxygen Cylinders खरेदीसाठी लघु निविदा प्रसिध्द करण्यात आली होती. निविदा प्रक्रियेनुसार निविदेतील एकमेव पात्र निविदाधारक मे. आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी यांना दि.०५.०४.२०२१ च्या कार्यादेशानुसार २०० Dura Oxygen Cylinders चा पुरवठा करण्यासाठी आदेश देण्यात आले होते कंपनीस देण्यात आलेल्या आदेशानुसार मे. आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी यांनी पुरवठापूर्व तपासणीसाठी कळविले असता तज्ञ समिती मार्फत दि. १२.०४.२०२१ रोजी पुरवठापूर्व तपासणीसाठी ३५ Dura Oxygen Cylinders तपासणीसाठी तयार होते. त्यानुसार त्यांना ३५ Dura Oxygen Cylinders चा पुरवठा करण्यास परवानगी देण्यात आली होती. ३५ सिलेंडरर्सच्या पुरवठ्यास परवानगी देण्यात आल्यानंतर मे आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी यांनी ३५ सिलेंडर्सचा तात्काळ पुरवठा करणे अपेक्षित होते. तथापि पुरवठादाराने पुरवठा केला

नाही. तसेच उर्वरीत पुरवठ्यासाठी पुरवठापूर्व तपासणीसाठी देखील कळविले नाही. तसेच त्यांनी सुरक्षा ठेव रक्कम व १.५ टक्के रक्कम देखील जमा केलेली नाही.

**०२.** मे. आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी यांनी पुरवठा न केल्यामुळे त्यांचे कार्यादेश रद्द करण्याचे प्रस्तावित करण्यात आले होते आयुक्त यांनी मे आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी यांना तीन दिवसांची अंतिम संधी देण्यात यावी असे निर्देश दिले होते. त्यानुसार मे. आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी यांना दि. २८.०६.२०२१ च्या पत्रानुसार कळविण्यात आले होते.तरी देखील मे. आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी यांनी पुरवठा केलेला नाही. त्यानुसार मे. आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी यांना Dura Oxygen Cylinders साठीचे कार्यादेश रद्द करून त्यांना काळया यादीत का टाकण्यात येऊ नये याबाबत दि. २६. ०७.२०२१ रोजीच्या पत्राद्वारे विचारणा करण्यात आली होती. मे आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी यांनी समाधानकारक स्पष्टीकरण सादर न केल्यामुळे त्यांना एक वर्षाच्या कालावधीसाठी काळया यादीत टाकण्याचे सहसंचालक आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई यांनी त्यांच्या दि. ०६.१२.२०२१ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार मे. आशीर्वाद इंडस्ट्रियल गॅसेस एलएलपी या कंपनीस एक वर्षाच्या कालावधीसाठी काळया यादीत टाकण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०३.** सदर प्रस्तावासाठी आयुक्त,आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई यांनी त्यांच्या दि.०४.०८.२०२१ रोजीच्या टिप्पणीन्वये मान्यता दिलेली आहे. तसेच या बाबतची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई , सहसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय , मुंबई व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१०२१५०७४३७६१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30,
cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2021.12.23 14:18:30 +05'30'

**(वि.ल.लहाने)**
**सहसचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि.परेल,मुंबई

३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यास्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
६) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
११) अधिकक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)